

# गड आणि किल्ले संवर्धन

भारतीय इतिहासात राजकारण व राज्य कारभारात गड आणि किल्ल्यांचे अनन्यसाधारण महत्त्व आहे. राजघराण्यातील संघर्ष आणि सत्तांतर यामधील घटनास्थळे गड आणि किल्ले यामधून झाल्याचे. इतिहासाच्या नोंदीतून प्रत्ययास येते. काळाच्या ओघात गड, किल्ले, जलाशय, विहिरी, बुरूज, खंदक, स्तंभ, दगडी तोफा, ढाल-तलवारी, हत्ती, घोडे, रथ, अंबाऱ्या यांची उपयुक्तता कमी झाली किंवा पूर्णपणे संपुष्टात आली. कालांतराने ते सर्व दुर्लक्षित राहिलेल्या साधन सामुग्रीमुळे आपली ऐतिहासिकता गमावून आहेत.



**परिंडा किल्ल्यातील तोफा व दगडी गोळे**

गड आणि किल्ला हे सैन्याचे अविभाज्य घटक आहेत. परंतु सध्या सर्व किल्ले, गड, त्यावरील शस्त्रसंभार, यांच्या पासून भारतीय सेनादले संपूर्णपणे तुटलेली आहेत. धरबंध सुटलेल्या पर्यटकांना मौजमजा करून मुद्दाम किंवा नकळत आपण अनेक

ऐतिहासिक वास्तूंची हेळसांड होते आहे याची जाणीव नसते. वाहनांच्या गर्दीतून गडावर वाट काढत पायी जाणाऱ्या लोकांना नसती अडचण म्हणून मनातल्या मनात निंदा केली जाते. असो.

पर्यटकांना इतिहासातील घटना व गड किंवा वास्तूंची ओळख करून देणारे कुठे कुठे फलक असतात ते वाचायला फार लोक जाताना दिसत नाहीत. सध्या गड आणि अन्य स्थळांची पिकनिकची ठिकाणे झाली आहेत. म्हणून त्यांना ऐतिहासिक पर्यटनस्थळांत रुपांतर करण्यासाठी आपणास काय करता येईल? या सर्वावर मात करण्यासाठी काही उपाय आहेत का?

असे विचार करता खालील बिंदू ध्यानात येतात.

१. गड आणि किल्ले हे सैनिकी पर्यटनस्थळे म्हणून विकसित करायला हवीत. ती कशी? पडलेल्या बुरुजाच्या किंवा तटबंद्या दुरुस्त करून पुन्हा त्याच दिमाखात बनवून वास्तूंची शान मिळवता येईल. परंतु सध्याच्या पुरातत्व

विभागातील विचारसरणी आणि त्यांच्या कडील तुटपुंज्या अर्थिक तरतुदी व मनुष्यबळ वगैरे बाबी लक्षात घेऊन असे बांधकाम शक्य होईल असे नाही. परंतु संगणकाच्या मदतीने या वास्तूंची त्रिमितीय पद्धतीने काल्पनिक निर्मिती करायला हवी. ती माहिती वास्तूपाशी इतिहासातील एक एक घटना जीवंत करून त्या त्या गड आणि किल्ल्यांची महती गाता येईल.

२. पर्यटकांना फुटक्या व मोडतोड झालेल्या वास्तू पहायला मिळतात. त्यात अनेक ठिकाणी तोफा काही तोफगोळे, इतरत्र कुठेही पडलेल्या अवस्थेत दिसतात. पण ती शस्त्रे कशी वापरायची किंवा युद्धात वापरली जात होती याचे प्रात्यक्षिक द्यायला लागणारी यंत्रणा व साधनसामुग्री नसते. जर या साधनांचा वापर करून त्यांच्या

उपयुक्ततेची चाचणी सैनिकी तळांवर केली गेली आणि त्याच्या चित्रफीती तयार करून पर्यटकांना माफक दरात दाखवायची व्यवस्था करण्यात यावी.

३. सध्या पर्यटकांना सोईस्कर पाणी व भोजनाची, चटक पटक खाण्यासाठी अनेक स्टॉल हॉटेल कार्यरत आहेत. मात्र जर तशी सोय नसेल तर? ज्या वेळी या वास्तू ऐतिहासिक काळातील माणसांनी, गरजेच्या वस्तूमुळे गजबजलेल्या असतील तेव्हा तिथल्या लोकांना पाणी पुरवठा योजना, धान्य साठवण, मल विसर्जन व्यवस्था कशी करण्यात येत असे? याचे वर्णन व प्रात्यक्षिक सैन्य दलातील सध्याच्या परिस्थितीत कसे होते ते कसे बदलत गेले यांच्या चित्र फिती तयार करण्यात याव्यात.

४. युद्ध साहित्य मुख्यतः तोफा, दारूगोळा व हातघाईवर कामाला येणाऱ्यात तलवारी-ढाली, अन्य धारदार शस्त्रे कुठे बनवली जायची? समजा त्या काळात खडे १० लाख सैन्य होते तर त्यांना प्रत्येकी कमीत कमी ४-५ तलवारी लागतात असे धरून ५० लाख तलवारी व ढाली यांचे कारखाने कुठे कुठे होते. त्याला लागणारे धातूच्या खाणी कुठे होत्या? आहेत? त्यांवर नियंत्रण करायला लढाया झाल्या? सध्याच्या काळात कुवेत वर इराकी हल्ला झाला होता तेंव्हा अमेरिकेला धावून जावे लागले, कारण त्यांचे तेल विहिरी व अन्य अर्थिक संबंध त्यात अडकले होते. हे सगळे आपण अनुभवले.

५. तंबू, तात्पुरते बांधकाम, व सैनिकी चौक्या कशा बनवत असत? सैन्याच्या दिमतीचे हत्ती, घोडे, उंट व अन्य जनावरे यांचे अनन्यसाधारण महत्त्व होते.  युद्धात कामी येणाऱ्या हजारो जनावरांची पैदास आणि प्रशिक्षण कुठे, कसे, कोण करत असत?

६. टपाल आणि निरोप घेण्या देण्याची व्यवस्था, लेखी करार पत्रव्यवहार, शेतसारा भरायची व त्यांच्या नोंदणीची सोय या सर्व विविध संकल्पनांवर अनेक छोट्या छोट्या शॉर्ट फिल्म काढायला व त्यांच्या माफक दरात दाखवायला ठेवून वास्तूंची देखभाल करायला लागणाऱ्या धनाचा विनियोग करता येईल.

७. जाणता राजा हे भव्य नेत्रदीपक नाट्य मंचन प्रत्येक वेळी करणे शक्य होईल असे नाही. परंतु या नाट्यमय अनुभवाची सोय गडांवर किंवा वस्तुसंग्रहालये, आणि अनेक शिवप्रेमी संस्थांना उपलब्ध करून देण्यात याव्यात.

वरील बिंदूंवर प्रस्तूत लेखकाने शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे, श्री पांडुरंग बलकावडे, डॉ. प्र. के. घाणेकर, डॉ. सचिन जोशी, श्री अभिजित बापट, श्री मोहन शेटे, आणि अन्य अनेक इतिहास तज्ज्ञांची, निवृत्त ले. जनरल पाटील, ले. जनरल शेकटकर, ले. जनरल पाटणकर, ब्रिगेडियर हेमंत महाजन, ब्रिगेडियर गोळे, महाराष्ट्र सैनिक पर्यटनाचे मुख्य कर्नल जतकर, एअर मार्शल भूषण गोखले, एअर मार्शल सोमण, आदींची प्रत्यक्ष भेट व फोन वरून घेऊन त्यांनी या बिंदूंवर विचार करून सेनादलाच्या सहभागाची, भावी तरुणांनी संगणकाच्या सहायाने भग्न वास्तूंना दुरुस्त करून स्मार्ट मोबाईल धारकांना उपयोगी अशी ऍप्स तयार करायची उर्मी दाखवली आहे.

उद्योजक श्री. कौस्तुभ बुटाला यांच्या सारख्या तरुण नेतृत्वाखाली प्रतापग़ड जीर्णोद्धार समितीच्यावतीने प्रतापगडाच्या बुरुजांचे व अन्य अवशेषांचे पुनर्निर्माण करायचे कार्य पूर्ण झाले. उत्साही दुर्ग प्रेमी, राज्य सरकारच्या विविध प्रकल्पातून आणखी अनेक वास्तूंच्या पुनरुद्धाराचे कार्य हाती घ्यायचा निर्धार मिलिट्री कमांडरच्या वतीने केला आहे.

संगणकासहायाने भग्न वास्तूंना त्यांचे प्राचीन गौरवपूर्ण पूर्ववैभव दिमाखात कसे दर्शवता येईल याचे एक प्रात्यक्षिक प्रस्तूत



दर्शनीभागातील भग्न गजराज




त्यांच्या मूळ दिमाखदार आवेशात

# काय करता येईल?

खाली दर्शवल्याप्रमाणे बिनधारेच्या गंजलेल्या तलवारी, गवतात आणि आडवाटेला अस्ताव्यस्त पडलेल्या तोफा, गंजलेल्या ठासण्या व गडांच्या कुठल्याशा एका कोपऱ्यात दुर्लक्षित असे तोफ गोळे यांची लष्करातील तज्ज्ञांकडून तपासणी करून त्यांची मारक शक्ती, दुरुस्ती, देखभाल व उडवून वापरायच्या पद्धती यांची प्रात्यक्षिके, यांच्या चित्रफितीकरून त्यावेळच्या युद्धकलेची व लढायातील खडतरपणाची झलक अनुभवायला मिळाली तर सध्याच्या सेनादलाबद्दलचा आदरभाव वाढीला लागेल.

वरील विचारांवर आपली प्रतिक्रिया आणि शक्य ते सहकार्य आपेक्षित. धन्यवाद.





आपले विचार समजून घ्यायला आवडेल.

ए ४ -४०४ गंगा हॅमलेट सोसा. विमाननगर पुणे ४११०१४. मो.९८८१९०१०४९.